**महाराष्ट्र शासन राजपत्र भाग - दोन मधील नाव, जन्मतारीख (वय) व धर्म बदल करावयाच्या जाहिरातींचे व इतर राजपत्रात प्रसिध्द करण्यात येणाऱ्या सूचना व अधिसूचना यांचे दर सुधारीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- मुलेसा -२०१४/प्र.क्र. १४१/उद्योग-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक ५ मार्च, २०१५

**वाचा :-**

१) मुद्रण व लेखनसामग्री नियम पुस्तिका परिच्छेद क्रमांक ६.२१
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक- पीपीएम-१८८१/६१४७३/(७६६५) /इन्ड-६, दिनांक २१/२/१९८१
३) शासन ज्ञापन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक- पीपीएम-१०९९/९३०७/उद्योग-६, दिनांक १५/९/२०००
४) शासन ज्ञापन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक- २००१/९४०८/उद्योग-६, दिनांक २३/३/२००२
५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, टीसीएस-२०११/प्र.क्र. १५/११/उद्योग-४, दिनांक ७ जुलै, २०१४
६) संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-ग्रंथागार/जी-१/राजपत्र दरनिश्चिती/२०१४-२०१५/१८०८/कार्या-१०, दिनांक १७ सप्टेंबर, २०१४व क्रमांक ३१३५/कार्या-१०, दिनांक १३/१/२०१५, क्रमांक ३१९३/कार्या-१०, दिनांक १९/१/२०१५ व क्रमांक ३३७२/कार्या-१०, दिनांक ९/२/२०१५.

**प्रस्तावना :-**

मुद्रण संचालनालयाकडून प्रसिध्द करण्यात येणाऱ्या खाजगी अधिसूचना/जाहिराती इत्यादी संबंधातील महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रांचे दर दिनांक २१/२/१९८१ च्या शासन निर्णयान्वये मुद्रण संहिता परिच्छेद क्रमांक ६.२१ मध्ये नमूद दरानुसार निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यानंतर शासनाने दिनांक १५/९/२००० चे आदेशान्वये राजपत्रासाठी सर्वसाधारण दर रुपये १२०/- व मागासवर्गीयांसाठी रुपये ६०/- इतका दर आकारण्यास मान्यता दिली आहे. शासन ज्ञापन दि.२३/३/२००२ अन्वये शासकीय प्रकाशनाच्या प्रचलित दरामध्ये सरसकट २० टक्के दरवाढ करण्यास तसेच प्राथम्याने प्रसिध्द होणाऱ्या जाहिरातींसाठी सरसकट प्राथम्य शुल्क रुपये ५००/- इतके आकारण्यास मान्यता दिली आहे. दरम्यानच्या काळात शासन निर्णय दिनांक ७ जुलै, २०१४ अन्वये नाव, वय व धर्म बदलण्याचे राजपत्र जनतेस विनासायास मिळण्यासाठी ही सुविधा संचालनालयाच्या www.dgps.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यानुसार आता राजपत्र ऑनलाईन प्रसिध्द होत असल्याने, सर्वसाधारण व प्राथम्य नोटीस असा फरक करता येणार नाही. या सर्व बाबींचा विचार करुन मुद्रण संचालनालयाकडून प्रसिध्द

करण्यात येणाऱ्या खाजगी अधिसूचना/जाहिराती इत्यादी संबंधातील महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रांचे दर सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय,**

मुद्रण व लेखनसामग्री नियम पुस्तिका परिच्छेद क्रमांक ६.२१ मधील नाव, वय व धर्म यात बदल झाल्याबाबतची नोटीस /जाहिरात प्रसिध्द करण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या तसेच शासन ज्ञापन दिनांक १५/९/२००० अन्वये निश्चित केलेल्या दरामध्ये सुधारणा करुन आता याकरीता प्रत्येक नोटीस/जाहिरातीसाठी रुपये ५००/- तसेच अनुसूचित जाती, अनूसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, नवबौध्द आणि विदर्भाच्या विनिर्दिष्ट क्षेत्रांबाहेरील जनजाती यांचेकरीता प्रत्येक नोटीस/जाहिरातीसाठी रु. २५०/- इतका दर आकारण्यात यावा. मुद्रण संचालनालयाकडून सर्व राजपत्र www.dgps.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध होत असल्याने यापुर्वी दिनांक २३/३/२००२ च्या ज्ञापनान्वये राजपत्रामध्ये प्रसिध्द होणाऱ्या जाहिरातीकरीता सरसकट रु. ५००/- इतके आकारण्यात येणारे प्राथम्य शुल्क यापुढे आकारण्याची आवश्यकता नाही.

मुद्रण संचालनालयाकडून सर्व राजपत्र www.dgps.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध होत असल्याने या सेवेकरीता महाऑनलाईन यांचे सेवा शुल्क, शासन निर्णय दिनांक ७ जुलै, २०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार राहील.

२. तसेच मुद्रण व लेखनसामग्री नियम पुस्तिका परिच्छेद क्रमांक ६.२१ मधील अ. क्र. २ ते ४ येथील अधिसुचना/जाहिरांतीसाठी दिनांक १५/९/२००० च्या ज्ञापनान्वये निश्चित केलेल्या दरामध्ये सरसकट २० टक्के दरवाढ करुन सदरचे दर खालीलप्रमाणे सुधारीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| मुद्रण व लेखनसामग्री नियम पुस्तिका परिच्छेद क्रमांक ६.२१ मधील अ. क्र. | नोटीश/जाहिरातीचे स्वरुप | सुधारीत दराचा तपशील |
|---|---|---|
| २ | रोखे, शासकीय वचनपत्रे, बंधपत्रे इत्यादी गहाळ झाल्यासंबंधीच्या नोटीसा | (एक) १५० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. ७२०/-<br>(दोन) १५१ ते ३०० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. १४४०/-<br>(तीन) ३०१ ते ६०० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. २८८०/-<br>(चार) ६०१ ते ७५० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. ३६००/-<br>(पाच) ७५१ ते ९०० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. ४३२०/-<br>(सहा) ९०१ ते १४०० शब्दांसाठी म्हणजेच संपूर्ण पृष्ठांसाठी जास्तीत जास्त रु. ४६००/- |
| ३ | भागीदारीचे विसर्जन, इ. सारख्या संकीर्ण नोटीसा. | (एक) १५० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. ७२०/-<br>(दोन) १५१ ते ३०० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. १४४०/-<br>(तीन) ३०१ ते ६०० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. २८८०/-<br>(चार) ६०१ ते ७५० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. ३६००/-<br>(पाच) ७५१ ते ९०० शब्दांसाठी जास्तीत जास्त रु. ४३२०/-<br>(सहा) ९०१ ते १४०० शब्दांसाठी म्हणजेच संपूर्ण पृष्ठांसाठी जास्तीत जास्त रु. ४६००/- |

| | | |
|---|---|---|
| ४ | नगरपालिका, स्थानिक मंडळे, निमसरकारी संस्था, शासकीय कार्यालये यांच्याकडून मिळणाऱ्या नोटीसा (आकारणीयोग्य नोटीसा) इत्यादी. या नोटीसा प्रत्यक्षात छापण्यात आल्यानंतर त्यासंबंधातील देयके पाठविण्यात येतात. | **साधारण राजपत्राचे दर**<br>(एक) पूर्ण पृष्ठ १ स्तंभ रु. २३००/- व २ स्तंभ रु. ४६००/-<br>(दोन) अर्ध पृष्ठ १ स्तंभ रु. ११५०/- व २ स्तंभ रु. २३००/-<br>(तीन) ३/४ पृष्ठ १ स्तंभ रु. १७२५/- व २ स्तंभ रु. ३४५०/-<br>(चार) १/४ पृष्ठ १ स्तंभ रु. ५७५/- व २ स्तंभ रु. ११५०/-<br><br>**असाधारण राजपत्राचे दर**<br>(एक) पूर्ण पृष्ठ १ स्तंभ रु. ४६००/- व २ स्तंभ रु. ९२००/-<br>(दोन) अर्ध पृष्ठ १ स्तंभ रु. २३००/- व २ स्तंभ रु. ४६००/-<br>(तीन) ३/४ पृष्ठ १ स्तंभ रु. ३४५०/- व २ स्तंभ रु. ६९००/-<br>(चार) १/४ पृष्ठ १ स्तंभ रु. ११५०/- व २ स्तंभ रु. २३००/- |

३. मुद्रण व लेखनसामग्री नियमपुस्तिका परिच्छेद क्रमांक ६.२२ नुसार राजपत्राच्या जाहिराती/सूचना प्रकाशित केल्यानंतर अशा राजपत्राच्या भागाच्या दोन प्रती जाहिरातदारांना विनामूल्य पुरविण्यात येत होत्या, परंतु आता नांव, जन्मतारीख (वय) व धर्म बदलण्याच्या जाहिराती ऑनलाईन स्विकारुन, ऑनलाईन राजपत्र उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने, नागरिकांना त्याच्या दोन प्रती विनामूल्य पुरविण्याची आवश्यकता नाही. जाहिरातदारांनी सदरची राजपत्रे संकेतस्थळावरुन डाऊनलोड करुन घ्यावी.

४. या संदर्भात संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशने संचालनालय, मुंबई यांनी आवश्यकता असल्यास मुद्रण व लेखन संहितेमध्ये सुधारणा करावी.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांचेकडील अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६७/१४/व्यय-१६, दिनांक २१/१०/२०१४ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०३०५१५०७२५५११० हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Vilaskumar Eknath Gaikwad

Digitally signed by Vilaskumar Eknath Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilaskumar Eknath Gaikwad
Date: 2015.03.05 15:20:50 +05'30'

**( वि. ए. गायकवाड )**
अवर सचिव
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**प्रति,**

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
यांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णयास योग्य ती प्रसिध्दी देण्यात यावी.

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (२ प्रती)
६) प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
७) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य १ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य १ (लेखापरीक्षा), मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य २ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
१०) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य २ (लेखापरीक्षा), नागपूर
११) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (ऊर्जा) , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) सर्व जिल्हाधिकारी
१६) वित्त विभाग, व्यय-१६, मंत्रालय, मुंबई
१७) संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई
१८) राज्यातील सर्व शासकीय मुद्रणालये व ग्रंथागारे (मुद्रण संचालनालयामार्फत)
१९) निवड नस्ती, उद्योग-४